**वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर व तिच्या सात संलग्न विभागीय कृषि विस्तार प्रशिक्षण संस्थाकरिता सन २०१४-१५ करिता रु.२५.९० लक्ष इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वनास-६९१४/प्र.क्र. १३० /३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
**तारीखः- ३० मार्च ,२०१५**

*<u>वाचा</u>–*

१) शासन निर्णय क्रमांकः वनास १०००/प्र.क्र.८९/१९ अे, दि.१७ जुलै,२००१
२) शासन निर्णय क्रमांकः वनास ६९१४/प्र.क्र.१३०/३ अे, दि. १५ मे,२०१४
३) शासन निर्णय क्रमांकः वनास ६९१४/प्र.क्र.१३०/३ अे, दि. ३० जून,२०१४
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक:अर्थसं-२०१४ /प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि.१७ एप्रिल,२०१४
५) शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग क्र.अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि. ९.२.२०१५

**<u>प्रस्तावना</u>**

राज्यातील कृषि विकास घटकाचे महत्व लक्षात घेऊन कृषि आणि कृषिशी निगडीत विषयाबाबत अद्यावत प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ही संस्था शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली आणि राज्यातील नागपूर,दौंड,औरंगाबाद,अमरावती,नाशिक, कोल्हापूर व खोपोली येथील सात प्रशिक्षण संस्था या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या सहकारी व संलग्न संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत. दिनांक १७ जुलै,२००१ च्या शासन निर्णयानुसार नागपूर येथील शिखर प्रशिक्षण संस्था आणि तिच्या विभागीय सात संलग्न संस्था स्वायत्त संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या.

वनामती, नागपूर ही शिखर प्रशिक्षण संस्था एक अग्रणी आणि नामांकित प्रशिक्षण संस्था म्हणून तातडीने विकसित करून यशदा पुणे तथा मॅनेज, हैद्राबाद या अग्रगण्य संस्थाच्या धर्तीवर कार्यान्वित होण्यासाठी पायाभूत सोई सुविधा उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.शिखर प्रशिक्षण संस्था आणि तीच्या सात संलग्न विभागीय संस्थाकरिता संदर्भाधिन दिनांक १७ जुलै,२००१ च्या शासन निर्णयात दिलेल्या मान्यतेनुसार इमारतीचे बांधकाम,वाचनालय, वसतीगृह,अधिकारी/कर्मचारी निवासस्थाने व इतर अनुषंगिक बांधकामे, साधनसामुग्री इत्यादी करिता राज्य शासनाच्या अनुदानातून निधी उपलब्ध करून देणे गरजेचे आहे. त्या अनुषंगाने वनामती व तीच्या सात संलग्न संस्थेकरिता करावयाच्या बांधकामासाठी सन २०१४-१५ करिता रू ५०.०० लक्ष मधून नियतव्यय मंजूर आहे. त्यास शासन दि.२९ ऑक्टोबर, २०१४ अन्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली. तसेच लेखानुदानान्वये मंजुर रु.११.६० लक्ष निधीस वित्तीय मान्यता शासन संदर्भाधीनक्र.३ अन्वये देण्यात आली आहे. अर्थसंकल्पित अनुदानाच्या ७५% अनुदानास वित्तीय मान्यता देणे आवश्यक असल्याने लेखानुदानाव्दारे मंजूर रु.११.६० लक्ष वगळता उर्वरीत मर्यादेत रु.२५.९० लक्ष इतक्या अनुदानास वित्तीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय–**

त्या अनुषंगाने वनामती व तीच्या सात संलग्न संस्थेकरिता करावयाच्या बांधकामासाठी सन २०१४-१५ करिता रू ५०.०० लक्ष मधून नियतव्यय असुन त्यापैकी अर्थसंकल्पित अनुदानाच्या ७५% मर्यादेत अनुदान वितरीत करावयाचे असल्याने लेखानुदानान्वये मंजुर रू.११.६० लक्ष वजा जाता उर्वरीत रु.२५.९० लक्ष निधीस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. प्रत्यक्ष निधी खर्चासाठी उपलब्ध करताना वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४

व५च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे पालन करावे. व याबाबत खात्री करुन तसे प्रमाणित करावे. व त्यानंतर प्रत्यक्ष निधी खर्चासाठी उपलब्ध करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.मंजुर केलेल्या रु.२५.९० लक्ष (रू.पंचवीस लक्ष नव्वद हजार फक्त) निधी खर्च करण्यास संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी मंजूर केलेला निधी वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर यांचेकडे हस्तांतरित करण्याची व त्याबाबतची मार्गदर्शक सुचना देण्याची कार्यवाही करावी. मंजुरी दिलेला रु.२५.९० लक्ष (रू.पंचवीस लक्ष नव्वद हजार फक्त) निधी खालील लेखा शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१४-१५ च्या मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-३
२४०१, पीक संवर्धन
१०९ विस्तार व प्रशिक्षण
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनातंर्गत योजना
(०१) (४७) वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थाची आस्थापना,
(२४०१ २६४९) ३१-सहाय्यक अनुदान

वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर आणि तीच्या संलग्न कृषि विस्तार प्रशिक्षण संस्थाची बांधकामे, अनुषंगीक बाबी इत्यादीकरिता सातत्याने पाठपूरावा करून कामे पुर्ण करून घेण्याची यामध्ये मुख्यत्वे करून महिलांची वसतीगृहे याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाकडे निधी वर्ग करण्याची व प्रस्तावित बांधकामाची कामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करवून घेण्याची तसेच निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक(आत्मा) कृषि आयुक्तालय,पुणे यांना वेळोवेळी सादर करण्याची जबाबदारी संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,(वनामती )नागपुर यांची राहिल. असून संचालक (आत्मा)कृषि आयुक्तालय,पुणे यांनी या योजनेच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात, व प्रस्तुत कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ मधील आतापर्यंत वितरीत निधीच्या अंतर्गत झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाकडे सादर करण्याची कार्यवाही करावी.

हे आदेश नियोजन/ वित्त विभागाचे अनु.क्र. अनोपचारीक संदर्भ क्र.५४४/१४३१ दिनांक २६/३/२०१५ व नौपचारीक संदर्भ क्र.४५१/व्यय १ दिनांक ३०/३/२०१५ दिलेल्या सहमतीनुसार तसेच मा.अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१९१७०८३३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidyadhar
Mahadev Borkar

Digitally signed by Vidyadhar Mahadev Borkar
DN: CN = Vidyadhar Mahadev Borkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.03.30 19:27:13 +05'30'

( वि.म.बोरकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
२) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे-१,

४) संचालक, (आत्मा), तथा कृषि नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
५) संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर.
६) व्यवस्थापक संचालक,महाराष्ट्र राज्य वियाणे महामंडळ,अकोला.
७) व्यवस्थापक संचालक,महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई.
८) सर्व मा.विधान सभा / विधान परिषद सदस्य
९) सर्व संचालक/ सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,खोपोली,ता.खानापूर,जि.रायगड.
११) प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,गेट क्रमांक ४,शहाजी नगर,लाईन, बाजार कोल्हापूर
१२) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बुलडोजर युनिट,शिवाजी नगर, पोस्ट ऑफीस जवळ, च-होली , पुणे.
१३) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,संभाजी चौक, उंटवाडी रोड, नाशिक.
१४) प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,.शहानुर मिया, दर्गा रोड, औरंगाबाद.
१५) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,तपोवन रोड, अमरावती,
१६) प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बंगला क्रमांक ६२/१, धरमपेठ, व्ही.आय.पी.रोड, सीव्हील लाईन, नागपूर.
१७) विभागीय कृषी सह संचालक (सर्व),
१८) कृषि सहसंचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी (सर्व),
२०) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
२१) महालेखापाल-२, महाराष्ट (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), नागपूर.
२२) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालय,मुंबई.
२३) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून
२४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून
२५) वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१३),मंत्रालय,मुंबई-३२
२६) नियोजन विभाग,),मंत्रालय,मुंबई-३२
२७) अवर सचिव,कार्यासन २-अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई ३२.
२८) निवड नस्ती कार्यासन ३-अे.